**केंद्र व राज्य पुरस्कृत योजनेअंतर्गत तक्रारींचे निराकरण करणेसाठी समित्या गठीत करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक इंआयो-पिआयएल-2008/प्र.क्र. 13/योजना-10**
**मंत्रालय, मुंबई -400 032**
**दिनांक 8 जुन, 2009**

**प्रस्तावना**

जिल्हा परिषद, पंचायत समित्या व ग्राम पंचायती मार्फत विविध केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांची अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर सर्व योजनांचे अंमलबजावणीत राज्यातील ग्रामपंचायतीचा प्रत्यक्ष/ अप्रत्यक्ष सहभाग असतो. सदर योजनांच्या अंमलबजावणीबाबत पंचायत समिती व जिल्हा स्तरावर ब-याच तक्रारी/ निवेदन प्राप्त होतात. तथापि सदर तक्रारींची शहानिशा करणेसाठी सद्यःस्थितीत परिणामकारक व्यवस्था नसल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे प्राप्त तक्रारी/ निवेदनाबाबत तात्काळ चौकशी होऊन कार्यवाही झाली नाही तर जनसामान्यांमध्ये संभ्रमाची अवस्था निर्माण होऊन शासनाची प्रतीमा मलिन होते. या सर्व बाबींचा विचार करुन, केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांच्या बाबतीत प्राप्त तक्रारींचे निराकरण करणेसाठी कायमस्वरुपी यंत्रणा निर्माण करणेची बाब शासनाच्या विचाराधिन होती. प्रकरणी एकंदरीत बाबींचा साकल्याने विचार करुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय**

जिल्हा परिषद, पंचायत समित्या व ग्रामपंचायती मार्फत केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, इंदिरा आवास योजना, पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रम, महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना, पंतप्रधान ग्राम सडक योजना, सर्व शिक्षण अभियान, भारत निर्माण कार्यक्रम, संपुर्ण स्वच्छता अभियान, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, एकात्मिक बालविकास सेवा योजना, कृषि विषयक केंद्र पुरस्कृत कार्यक्रम, तसेच राज्य पुरस्कृत राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र. 1 व क्र. 2, जवाहर विहीर कार्यक्रम, इत्यादी कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यात येते.

सदर व जिल्हा परिषद/जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा तसेच पंचायत समितीच्या /ग्राम पंचायतीच्या माध्यमातून केंद्र व राज्य पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत सुरु असलेल्या ग्रामीण विकासाच्या योजना व भविष्यात येणाऱ्या केंद्र व राज्य पुरस्कृत ग्रामीण विकासाच्या योजनांबाबत तालुका व जिल्हास्तरावरील प्राप्त निवेदने व तक्रारींची चौकशी/ शहानिशा करुन त्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करणेसाठी जिल्हा व तालुका पातळीवर खालील प्रमाणे समित्यांचे गठण करण्यात येत आहे.

**केंद्र व राज्य पुरस्कृत योजना अंतर्गत जिल्हास्तरीय तक्रार निवारण समिती**

| | | |
|---|---|---|
| 1) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| 2) | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद / अतिरिक्त जिल्हाधिकारी | सह अध्यक्ष |
| 3) | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| 4) | उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (प्रशासन) | सदस्य |
| 5) | उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (ग्राम पंचायत) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| 6) | उप मुख्य कार्यकारी अधिकारी. (महिला व बालकल्याण ) | सदस्य |
| 7) | गट प्रमुख जलस्वराज्य | सदस्य |
| 8) | उप जिल्हाधिकारी (रोहयो) | सदस्य |
| 9) | जिल्हा पुरवठा अधिकारी | सदस्य |
| 10) | शिक्षण अधिकारी (प्राथमिक ) | सदस्य |
| 11) | कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| 12) | जिल्हा आरोग्य अधिकारी जिल्हा परिषद | सदस्य |
| 13) | जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य |
| 14) | जिल्हा अधिक्षक कृषि | सदस्य |
| 15) | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| 16) | कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग. जिल्हा परिषद | सदस्य |
| 17) | कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद | सदस्य |
| 18) | कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद | सदस्य |
| 19) | गटविकास अधिकारी पंचायत समिती सर्व | सदस्य |
| 20) | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | सदस्य सचिव |

या शिवाय आवश्यकतेनुसार जिल्हयातील अन्य अधिका-यांना निमंत्रीत सदस्य म्हणुन सभेस बोलविण्याचा तसेच तक्रारींची शहानिशा/ चोकशी करण्याचा आदेश देण्याचा अधिकार अध्यक्षांना राहील.

**<u>केंद्र व राज्य पुरस्कृत योजना अंतर्गत तालुकास्तरीय तक्रार निवारण समिती</u>**

| | | |
|---|---|---|
| 1) | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी /प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | अध्यक्ष |
| 2) | उपविभागीय अधिकारी (महसूल) | सहअध्यक्ष |
| 3) | तहसिलदार | सदस्य |
| 4) | उप विभागीय कृषि अधिकारी | सदस्य |
| 5) | बालविकास प्रकल्प अधिकारी | सदस्य |
| 6) | उपभियंता बांधकाम उपविभाग जि.प. | सदस्य |
| 7) | उपअभियंता लघुपाटबंधारे उपविभाग जि.प. | सदस्य |
| 8) | उपअभियंता ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग जि.प. | सदस्य |
| 9) | गट शिक्षणाधिकारी | सदस्य |
| 10) | तालुका वैद्यकीय अधिकारी | सदस्य |
| 11) | तालुका कृषि अधिकारी | सदस्य |
| 12) | पशुधन पर्यवेक्षकक (पंचायत समिती स्तरावरील) | सदस्य |
| 13) | गट विकास अधिकारी पंचायत समिती | सदस्य सचिव |

या शिवाय आवश्यकतेनुसार तालुक्यातील अन्य अधिका-यांना निमंत्रीत सदस्य म्हणुन सभेस बोलाविण्याचा तसेच तक्रारींची शहानिशा/ चौकशी करण्याचा आदेश देण्याचा अधिकार अध्यक्षांना राहील.

**समितीची कार्यपध्दती**

1) एखादी तक्रार/ निवेदन पंचायत समिती क्षेत्रांतर्गत कामाशी संबंधित असल्यास त्याचे अनुषंगाने तालुकास्तरीय समितीने कार्यवाही करावी. जर तक्रार एकापेक्षा जास्त पंचायत समिती क्षेत्राशी संबंधित असेल तर त्या बाबत जिल्हास्तरीय समितीने कार्यवाही करावी. तसेच एखादया अर्जदाराचे तालुकास्तरीय समितीच्या निर्णयाने समाधान झाले नसल्यास अगर तक्रार दिल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यात उत्तर न मिळाल्यास अशी व्यक्ती जिल्हास्तरीय समितीकडे अर्ज करु शकेल. मात्र अशा व्यक्तीने त्यासोबत तालुकास्तरीय समितीकडे केलेल्या तक्रार अर्जाचा तपशिल (शक्यतो तक्रारीच्या प्रतीसह) व तालुकास्तरीय समितीकडून प्राप्त उत्तराची प्रत (उत्तर प्राप्त झाले असल्यास ) जोडणे गरजेचे राहील. तसेच अशा अर्जात अर्जदाराने उत्तर का मान्य नाही याचा खुलासा करणे गरजेचे राहील.

एखादी तक्रार जरी जिल्हा स्तरावर प्राप्त झाली तरी, त्या अनुषंगाने तालुकास्तरीय समितीकडून कार्यवाही होणे योग्य होईल असे समिती अध्यक्षांचे / समितीचे मत झाल्यास, अशी तक्रार तालुकास्तरीय समितीकडे पाठविण्याचा अधिकार अध्यक्ष/ समितीस राहील मात्र त्या बाबत तसे अर्जदारास कारणांसह कळविणे बंधनकारक राहील.

2) तालुकास्तरीय व जिल्हास्तरीय समित्याच्या बैठका दर 3 महिन्यातून एकदा घेण्यात याव्यात. मात्र आवश्यकतेनुसार यापेक्षा अगोदर सर्व सदस्यांची एकत्रित अथवा त्या सभेच्या कामकाजापुरते आवश्यक निवडक सदस्यांची बैठक घेण्याचा अथवा अशी बैठक घेण्याबाबत सह अध्यक्ष यांना निर्देष देण्याचा अध्यक्षांना अधिकार राहील.

3) तालुकास्तरीय तक्रार निवारण समितीचे अध्यक्ष अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी व प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा हे असल्याने जिल्हयातील प्रत्येकी निम्मे तालुके मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी निश्चित करुन त्यांना द्यावेत.

4) तालुकास्तरावर व जिल्हास्तरावर प्राप्त तक्रारींची नोंद वही सोबतच्या प्रपत्र अ मध्ये ठेवावी. तसेच प्रपत्र ब मधे अहवाल जिल्हा स्तरीय समितीस व जिल्हा स्तरीय समितीने विभागीय आयुक्त व शासनास तिमाही संपताच 10 दिवसात सादर करावा.

5) प्राप्त झालेल्या तक्रारी /निवेदने अध्यक्षाच्या निर्दशनास आणून त्यावर पुढील कार्यवाही करणेस्तव सचिवांनी 10 दिवसात निर्णय प्राप्त करुन घ्यावेत.

6) अध्यक्षांनी दिलेल्या निर्णयानुसार व दिलेल्या विहित मुदतीत संबंधितानी चौकशी अहवाल स्वयंस्पष्ट निष्कर्ष/ अभिप्रायासह अध्यक्षांच्या नावे सादर करावा व प्रत सचिवांना अग्रेषित क्करावी. सचिवांनी आवश्यकतेनुसार अन्य माहिती/ तपशिल संबंधितांकडून प्राप्त करवुन घ्यावा व त्या आधारे तक्रारीत तथ्य आहे/ नाही/ अंशतः तथ्य आहे. (तसे असल्यास कोणत्या मुद्यात) या प्रकारे अभिप्राय / मत नोंदवावे व त्या अनुषंगाने अध्यक्षांचा निर्णय प्राप्त करवुन घ्यावा व ती तक्रार ज्या विभागाच्या अधिका-यांशी संबंधित आहे त्यांना कळवावा. त्यानुसार असा निर्णय प्राप्त झाल्यापासून तीन कार्यालयीन कामाचे दिवसात तक्रारदारास योग्य ते उत्तर देण्याची व त्याची प्रत सदस्य सचिव यांना देण्याची जबाबदारी संबंधित अधिका-यांची राहील.

7) सदर समितीच्या निर्णयाप्रमाणे संबंधित अधिकारी व कर्मचारी यांनी कार्यवाही करावी. समितीच्या

निर्णयाप्रमाणे कार्यवाही न केल्यास संबंधितावर प्रशासकीय कारवाई करणेसाठी शिफारस करण्याचा अधिकार समितीला / प्रसंगानुरुप समिती प्रमुखांना राहील.

8) त्रैमासिक बैठकीमध्ये जिल्हा व तालुका स्तरावर प्राप्त तक्रारी/ निवेदनांबाबत सविस्तर आढावा घेण्यात यावा व तक्रारीचे निवारण झाले किंवा नाही याची खात्री करावी. आवश्यकतेनुसार तक्रारदारास समितीसमोर ( म्हणणं मांडण्यासाठी) बोलविण्याची मुभा समिती प्रमुख अध्यक्षास/ सचिवास राहील.

9) तालुकास्तरीय समितीने सभेचे इतिवृत्त सभा होताच पाच दिवसात जिल्हास्तरीय समितीस सादर करावे.

10) जिल्हास्तरीय समितीने त्रैमासिक बैठकीचे इतिवृत्त सभा होताच पाच दिवसात विभागीय आयुक्तांना व राज्य शासनास सादर करावे.

11) प्राप्त तक्रारी/ निवदेनांवर सर्वसाधारणपणे एका महिन्याच्या आत शहानिशा/ चौकशी होऊन निर्णय झाला पाहिजे. चौकशीचे स्वरुप व्यापक असल्यास संबंधित समितीने मुदत निश्चित करुन दयावी. तसेच एक महिन्यात अगर समितीने निश्चित करुन दिलेल्या मुदतीत चौकशी पुर्ण करणे शक्य न झाल्यास / तसे दिसून आल्यास चौकशी करणा-या अधिका-याने / प्रमुख अधिका-यांने अध्यक्षांकडून (कारणमिमांसा नमूद करुन ) मुदतवाढ प्राप्त करवून घ्यावी. मुदतीत कार्यवाही करणे संबंधितांवर बंधनकारक राहील.

12) तक्रारीची चौकशी करतेवेळी संबंधित तक्रारदारास स्वतःचे म्हणणे मांडण्याची पुरेशी व वाजवी संधी देणे अनिवार्य आहे.

वरील प्रमाणे दिलेल्या सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र 200906081903370001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अविनाश सुभेदार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन .

D:\D3\D-3\AWAIT D 3.doc

**प्रतः-**

१) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२) मुख्यमंत्र्यांचे सचिव

३) सर्व मंत्रालयीन विभागांचे सचिव

४) सर्व विभागीय आयुक्त

५) जिल्हाधिकारी, सर्व

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा सर्व

७) प्रकल्प संचालक , जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा सर्व

८) अप्पर संचालक, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष, पे अॅन्ड अकौंटस कॉम्प्लेक्स बॅरेक नं. १४ मुंबई -२१

९) निवडनस्ती ( योजना-१०).

**प्रपत्र अ**

**केंद्र व राज्य पुरस्कृत योजना अंतर्गत जिल्हा/ तालुकास्तरीय तक्रार नोंद वही**

**(सदस्य सचिव यांचे कार्यालयात ठेवावयाची नोंदवही)**

| अ.क्र. | निवेदन देणा-याचे/तक्रार देणा-याचे नाव व पत्ता | तक्रारीचा विषय | प्राप्त दिनांक | तक्रारीशी संबंधित अधिकारी व विभागाचे नाव | तक्रार चौकशीसाठी कोणाकडे दिली? व केव्हा दिली? | अहवाल प्राप्त होण्याचा अपेक्षित दिनांक | अहवाल प्राप्त झाल्याचा दिनांक | तक्रारीत तथ्य आढळून आले किंवा कसे? | तक्रारदारास उत्तर दिल्याचा दिनांक | केलेली कार्यवाही | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |

**टीप** - दर तिमाही अखेर गोषवारा काढून त्यावर सदस्य सचिवांनी, अध्यक्षांची स्वाक्षरी घ्यावी.

स्वत: सही करून

**केंद्र व राज्य पुरस्कृत ..जना अंतर्गत जिल्हा/ तालुकास्तरीय समितीकडे प्राप्त तक्रारींचा त्रैमासिक अहवाल**

माहे ------------- अखेर

| अ.क्र. | मागील तिमाही अखेर प्राप्त तक्रार अर्जाची / निवेदनांची संख्या | या तिमाहित प्राप्त तक्रार अर्जाची / निवेदनांची संख्या | एकूण | या तिमाहीअखेर निकाली काढण्यात आलेल्या तक्रार अर्जाची /निवेदनांची संख्या (तक्रारदारास उत्तर दिल्यानंतर तक्रार अर्ज/ निवदेन निकाली काढले असे समजण्यात यावे) | चौकशीचा निष्कर्ष | | | | या तिमाही अखेर शिल्लक असलेल्या तक्रार/ निवेदनांची संख्या | तीन महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी प्रकरणे प्रलंबित असल्यास त्याची कारणे | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | पुर्ण तथ्य आढळून आलेले अर्ज (अ) | अंशत: तथ्य आढळून आलेले अर्ज (ब) | अजिबात तथ्य आढळून न आलेले अर्ज (क) | एकूण ही संख्या (ड) (क्र.5 मधील संख्येशी जुळणे गरजेचे आहे) | | | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 |
| 1 | जिल्हा तालुकास्तरीय समित्यांकडे प्राप्त झालेले | | | | | | | | | | |
| 2 | तालुकास्तरीय समित्यांकडे प्राप्त झालेले | | | | | | | | | | |
| 3 | एकूण | | | | | | | | | | |

**अध्यक्ष**
**जिल्हा/ तालुकास्तरीय तक्रार निवारण समिती**

**सदस्य सचिव**
**जिल्हा/ तालुकास्तरीय तक्रार निवारण समिती**

टीप :-
1) तालुकास्तरीय समितीने याच नमुन्यात जिल्हास्तरीय समितीकडे अहवाल सादर करावा.
2) जिल्हा स्तरीय समितीने या नमुन्यात **1** मधे सर्व तालुकास्तरीय समित्यांची मिळून एकत्रित माहिती नमुद करावी.